महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान, तरंगती जेट्टी व तत्सम प्रवासी सुविधा पुरविणे (कार्यक्रम) लेखाशिर्ष बी-७ (३०५१ १८३५) या योजने अंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः बीजीटी १०२५/प्र.क्र.२३/बंदरे-२**
गृह विभाग, मंत्रालय
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १५ मे, २०२५

**संदर्भ**:-१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०७.०४.२०२५
२. शासन ज्ञापन समक्रमांक दिनांक- १३.०३.२०२५
३.महाराष्ट्र सागरी मंडळ यांचे पत्र जा.क्र.मसामं/मुकाअ/अभि-३/निधी वितरण प्रस्ताव/३०५१ १८३५/२०२५-२६/, दि.०४.०४.२०२५

**शासन ज्ञापन :-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरीता, महाराष्ट्र सागरी मंडळाकडून राबविण्यात येणाऱ्या महाराष्ट्र मेरीटाईम मंडळास सहायक अनुदान, तरंगती जेट्टी व तत्सम प्रवासी सुविधा पुरविणे (कार्यक्रम) या योजनेकरीता खालील कामांसाठी रु.९२.३७ कोटी (अक्षरी रु. ब्यान्नव कोटी सदत्तीस लक्ष फक्त) एवढा निधी, या शासन ज्ञापनाव्दारे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.कोटीत)**

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता रक्कम | यापूर्वी झालेला खर्च | २०२५-२६ करिता आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|
| १. | गोराई बीच ता.बोरीवली, जि.मुंबई उपनगर येथे सोलार दिवे लावणे सुशोभिकरण करणे व हायमास्ट बसविणे. (मुंबई) | ०.५८ | ०.०० | ०.५८ |
| २. | गीतानगर कुलाबा मुंबई येथील संरक्षक भिंतीची दुरुस्ती करणे. | २९.४४ | ०.०० | २०.०० |
| ३. | मनोरी जेट्टीजवळ मनोरी मालाड (प) येथे सौंदयीकरण करणे. ता.बोरीवली, जि.मुंबई उपनगर | ०.५७ | ०.०० | ०.३७ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४. | खारवाडेश्री, ता.पालघर येथे प्रवासी सुविधांचे बांधकाम करणे. | ८.९० | १.७५ | ४.४९ |
| ५. | अर्नाळा किल्ला ता.वसई, जि.पालघर येथे प्रवासी सुविधांचे बांधकाम करणे | ४.८४ | २.५० | ०.५० |
| ६. | वेहेळ ता.भिवंडी, जि.ठाणे येथे वेहेळ जेट्टी येथे सुशोभिकरण करणे प्रवाशी शेड बांधणे व इतर सुविधा पुरविणे. | १.५० | १.०० | ०.५० |
| ७. | घोडबंदर ता.जि.ठाणे येथे प्रवासी जेट्टीला वाहनतळ व टर्मिनल इमारत बांधकाम करणे. | ४.९८ | २.०० | ०.६० |
| ८. | मौजे पिंपळास, ता.भिंवडी, जि.ठाणे येथे अस्तित्वातील रँपची दुरुस्ती, मजबुतीकरण व सुशोभिकरण करणे | १.४० | १.०० | ०.४० |
| ९. | थळ, ता.अलिबाग जि.रायगड येथील जेट्टीची दुरुस्ती करणे. | ६.९५ | १.७५ | २.८० |
| १०. | ग्रा.वरेडी अंतर्गत वरेडी कोळीवाडा, ता.पेण, जि.रायगड येथे जेट्टी व प्रवासी निवारा शेड बांधणे. | १.९१ | १.०० | ०.७५ |
| ११. | वराठी येथील अस्तित्वातील जेट्टीचे मजबुतीकरण करणे व तत्सम सुविधा पुरविणे ता.महाड, जि.रायगड. | २.५२ | ०.०० | २.५२ |
| १२. | शेखाडी, ता.श्रीवर्धन जि.रायगड येथील जेट्टीची दुरुस्ती करणे. | १.४६ | १.०० | ०.४६ |
| १३. | पांगळोली ता.म्हसळा जि.रायगड येथे जेट्टीची दुरुस्ती करणे. | २.९० | ०.०० | २.३३ |
| १४. | वर्सोली ता.अलिबाग, जि.रायगड येथे रो-रो जेट्टी, पोचरस्ता, गाळ काढणे, दगडी बंधाऱ्याची दुरुस्ती करणे. | १०९.२२ | ०.०० | ३२.८८ |
| १५. | जयगड घाट ता.जि.रत्नागिरी येथील जयगड घाट ते जेट्टीपर्यंतच्या रस्त्याची दुरुस्ती करणे. | ५.०० | ०.०० | ४.५० |
| १६. | मौजे मजरेकाशी, ता.चिपळुन, जि.रत्नागिरी येथील जेट्टीची दुरुस्ती करणे. | ०.४५ | ०.०० | ०.३२ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १७. | फुणगुस मोहल्ला, ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी ते बंदराकडे जाणारा रस्ता काँक्रिटीकरण करणे. | ०.३२ | ०.०० | ०.३० |
| १८. | वेलदुर येथे प्रवासी जेटीची मजबुतीकरण करणे. | ४.८ | ४.४१ | ०.२४ |
| १९. | मोरा, ता.उरण, जि.रायगड येथील जेट्टीचे मजबुतीकरण करणे. | १९.२३ | १४ | ५.२३ |
| २०. | दिघी ता.श्रीवर्धन, जि.रायगड येथील जुन्या जेट्टीची लांबी व रुंदी वाढवून तेथे लिंकस्पॅप व पांटून बसविणे. | ८७.९ | ०.०० | ८.६० |
| २१. | बोरीवली रो रो जेट्टीलगत पार्किंग सुविधा निर्माण करणे व टर्मिनल इमारत बांधणे. | ११.९९ | ०.०० | ४.०० |
| | एकुण | ३०६.८६ | ३०.४१ | ९२.३७ |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ०७.०४.२०२५ शासन परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२६ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावीत.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई हे राहतील.

६. सन २०२५-२६ या वित्तीय वर्षाकरीता उपरोक्तप्रमाणे होणारा खर्च “मागणी क्र. बी-७, ०२. लहान बंदरे १९० सार्वजनिक उपक्रमालना सहाय्य (००) (००) (०२) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान, तरंगती जेट्टी व तत्सम प्रवासी सुविधा पुरविणे (कार्यक्रम) (३०५१ १८३५)-३५ तरंगती जेट्टी व तत्सम प्रवासी सुविधा पुरविणे या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन ज्ञापन, नियोजन विभाग अनौ.सं.क्र.१८२/का.१४६१ दि. २४.०४.२०२५ व वित्त विभाग अनौ.सं.क्र.२६६/२०२५/व्यय-८ दि. १३.०५.२०२५ अन्वये त्या विभागाच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५१५१२५२१२६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2025.05.15 12:54:54 +05'30'

**( निलिमा कांबळे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मंत्री, बंदरे विभाग, मंत्रालय मुंबई-३२ यांचे खाजगी सचिव.
२) अपर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग, यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
४) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
५) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
१०) निवडनस्ती (बंदरे-२).